**जल जीवन मिशन कार्यक्रमांतर्गत सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली (PFMS) करीता कार्यान्वित राज्य नोडल खात्यामध्ये लेखाशीर्ष (२२१५ २०७१) खाली सर्वसाधरण घटकाचा प्राप्त राज्य हिश्श्याचा निधी जमा करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जेजेएम-२०२०/प्र.क्र.९५/पापु १०**
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल,
क्रॅाफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई
तारीख: २४ सप्टेंबर,२०२०

वाचा:-

**संयुक्त सचिव, पेयजल व स्वच्छता मंत्रालय, भारत सरकार यांचे अर्धशासकीय पत्र क्र.PD-२६०२५/३/२०१९/SBM, दि.२९ मे, २०१९**

**<u>प्रस्तावना-</u>**

जल जीवन मिशन कार्यक्रमांतर्गत वित्तीय वर्ष २०२०-२०२१ करीता सर्वसाधरण घटकाखाली (राज्य हिस्सा) अर्थसंकल्पित केलेल्या रु.५००.०० कोटी निधीपैकी रु.७५.०० कोटी (१५%) इतका निधी वित्त विभागाने लेखाशीर्ष २२१५ २०७१ खाली अर्थसंकल्पिय वितरण व व्यवस्थापन प्रणालीवर उपलब्ध करुन दिला आहे.

संदर्भिय पत्रान्वये सर्व केंद्र सहाय्यीत योजनांकरीता सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली कार्यान्वित करण्याबाबत सूचित केले आहे. त्याअनुषंगाने जल जीवन मिशन या केंद्र सहाय्यीत योजनेअंतर्गत सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली कार्यान्वित करण्याकरीता राज्य स्तरावर स्टेट बँक ऑफ इंडियामध्ये राज्य नोडल खाते (State Nodal Account) उघडण्यात आले आहे. जल जीवन मिशन अंतर्गत सर्वसाधरण घटकाखाली (राज्य हिस्सा) वित्त विभागामार्फत प्राप्त उक्त रु.७५.०० कोटी (रुपये-पंचहात्तर कोटी फक्त) इतका निधी राज्य नोडल खात्यात जमा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## <u>शासन निर्णय-</u>

जल जीवन मिशन या केंद्र पुरस्कृत कार्यक्रमांतर्गत सन २०२०- २०२१ या आर्थिक वर्षातील सर्वसाधारण (राज्य हिस्सा) घटकाचा मागणी क्र. वाय-०२, लेखाशिर्ष २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१,

पाणी पुरवठा, १०२, ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, (०२), जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२) (१५) नळाव्दारे पाणी पुरवठा योजना- राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यकम यासाठी अनुदान (राज्यक्षेत्र), ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर) (२२१५ २०७१) या लेखाशिर्षाखालील रु.७५.०० कोटी (अक्षरी-रुपये पंचहात्तर कोटी फक्त) इतका निधी तात्काळ जल जीवन मिशन कार्यक्रमांतर्गत सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीकरीता (PFMS) उघडण्यात आलेल्या एस.बी.आय. बँकेच्या मुंबई मुख्य शाखा, मुंबई (IFSC Code- SBIN ०००००३००) येथे उघडण्यात आलेल्या राज्य नोडल खाता क्र.३९२२२५४८२४२ मध्ये जमा करण्यात यावा.

२. सदर रक्कम आहरित करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी अवर सचिव (रोखशाखा) (श्री.पां.रा.खोटरे) यांना व नियंत्रक अधिकारी म्हणून उप सचिव (श्री.रा.म.गेंगजे), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर रक्कम (श्री.पां.रा.खोटरे) आहरण व संवितरण अधिकारी तथा अवर सचिव (रोखशाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी एस.बी.आय फोर्ट, मुंबई मुख्य शाखा, मुंबई (IFSC Code- SBIN ०००००३००) येथे उघडण्यात आलेल्या राज्य नोडल खाता क्र.३९२२२५४८२४२ मध्ये जमा करावी.

हा शासन निर्णय वित्त विभागाचे अनौ.संदर्भ क्र.१५३/व्यय-३, दि.०७.०८.२०२० अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९२२११३११९२३२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VASANT BHIMRAO MANE

Digitally signed by VASANT BHIMRAO MANE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=280e2beac20f526041fee94f6226522e1407a7f6aa0b06c8769634d48c2976bc, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VASANT BHIMRAO MANE
Date: 2020.09.24 15:40:39 +05'30'

**वसंत माने**
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

प्रति,

१. श्री.रा.म.गेंगजे, उप सचिव, पाणी पुरवठा स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
२. श्री.पां.रा.खोटरे, अवर सचिव, पाणी पुरवठा स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई

प्रत,

१. महालेखापाल (लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ मुंबई/ २- नागपूर
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
३. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
४. मिशन संचालक, जल जीवन मिशन, बेलापूर, नवी मुंबई
५. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई
६. कार्यासन पापु-०४/२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
७. अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक